नियमित निवडसूची २०२३-२४:

**"सशस्त्र पोलीस अधीक्षक/समादेशक, रा.रा. पोलीस बल" या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र: रापोसे-०८२३/प्र.क्र.१८७ /पोल-१अ

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.

दिनांक : २६ जून २०२४.

**संदर्भ** :-

१) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ कार्या.-१२, दिनांक ०१.०८.२०१९.

२) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाची पत्र क्र.पोमसं/१/७४३०/नि.सू.२३-२४/समादेशक/१४७/२०२३, दिनांक २६.१०.२०२३

४) शासन पत्र, गृह विभाग, क्र.रापोसे-०८२३/प्र.क्र.१८७/पोल-१अ, दिनांक १२.०६.२०२४.

**शासन आदेश**.

"सशस्त्र पोलीस अधीक्षक/समादेशक, रा.रा. पोलीस बल" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या "सशस्त्र पोलीस उप अधीक्षक/सहायक समादेशक, रा.रा.पोलीस बल" या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या "नियमित निवडसूची २०२३-२४" यामध्ये समाविष्ट, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिकाऱ्यांना, तात्पुरत्या स्वरुपात, पुढील अटींवर, "सशस्त्र पोलीस अधीक्षक/समादेशक, रा.रा. पोलीस बल" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदांवर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे-

| अ.क्र. | पोलीस अधिकाऱ्याचे नाव | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | श्री. ईश्वर विठ्ठल चौधरी | समादेशक, गट क्र.१६, रा.रा. पोलीस बल, कोल्हापूर |
| २. | श्री. प्रभाकर महादेव शिंदे | समादेशक, गट क्र.६, रा.रा. पोलीस बल, धुळे |

**अटी**:-

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

२. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/न्यायालय यांचे आदेश, निवडणुकीची आदर्श आचारसंहिता, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

३. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.-/का.-१२(सेवा-३), दिनांक १०.०६.२०२४]* आणि पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांच्या शिफारशीचा यथायोग्य विचार करुन, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न यामध्ये निर्दिष्ट सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२६१५४४४०५७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MRUNAL KRISHNA SAWANT

Digitally signed by MRUNAL KRISHNA SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=0cb0d6ece0ccae8c84500c20573f214867456b72833559abe295a3addc1547c5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=410C5F7970E99BA8F8E7899E41A3E5C504381ED982CD86DE7B0B97C6881E3432, cn=MRUNAL KRISHNA SAWANT
Date: 2024.06.26 15:55:31 +05'30'

**( मृणाल कृष्णा सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, रा.रा. पोलीस बल, पुणे/नागपूर.
३) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*
४) निवड फाईल, पोल-१अ.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/ धुळे.